**नगर विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या प्रकल्पासाठी आवश्यक जागा उपलब्ध करून न घेतल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस निधी उपलब्ध न करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.४००/नवि-३३**

**मंत्रालय, मुंबई**

**दिनांक:- ११ ऑक्टोबर, २०१८**

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागामार्फत केंद्र शासन पुरस्कृत जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाचे UIDSSMT व UIG उपभियान, अमृत अभियान तसेच राज्य शासन पुरस्कृत महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत राज्यातील विविध शहरांमध्ये पायाभूत सुविधांच्या निर्मितीविषयक विविध प्रकल्प राबविण्यात येत आहे.

सदर योजनांच्या माध्यमातून प्रकल्प राबविण्यात येत असताना किंवा सदर प्रकल्पांचें डीपीआर तयार करताना प्रकल्पांच्या विविध उपांगासाठी आवश्यक असलेल्या जागा जसे पाणीपुरवठा प्रकल्पासाठी जलशुध्दीकरण केंद्र, मलनिस्ससारण प्रकल्पांसाठी मलशुध्दीकरण केंद्र इत्यादी महत्वाच्या उपांगासाठी जागा गृहीत धरून प्रकल्पाची आखणी केली जाते. तथापि प्रत्यक्ष प्रकल्प मंजूर झाल्यानंतर प्रकल्पाच्या आरेखनानुसार जागा प्रत्यक्षात उपलब्ध होत नाहीत किंवा सदर प्रयोजनार्थ आरक्षण उपलब्ध नसते. जलशुध्दीकरण व मलशुध्दीकरण केंद्रे ही प्रकल्पासाठी महत्वाची उपांगे असतात, सदर उपांगासाठी जागा उपलब्ध न झाल्यास शहरासाठी महत्वाचे असलेले प्रकल्प पूर्ण होत नाहीत. यामुळे नागरिकांना सदर पायाभूत सुविधांपासून वंचित रहावे लागते.

याबाबत शासन स्तरावर पार पडलेल्या विविध आढावा बैठकांमध्ये अशा प्रकारच्या बाबी शासनाच्या निदर्शनास आल्या होत्या. सबब, अशा स्वरुपाच्या समस्या भविष्यात उद्भवू नये यासाठी भविष्यात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्पांच्या उपांगासाठी आवश्यक असलेल्या जागा उपलब्ध होईपर्यंत राज्य शासनाच्या विविध योजनातून कोणतेही अनुदान न देण्याच्या अनुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नगर विकास विभागाच्या केंद्र व राज्य शासनाच्या योजनेतून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्पांच्या उपांगासाठी आवश्यक असलेल्या जागा उपलब्ध होईपर्यंत राज्य शासनाच्या विविध योजनातून कोणतेही अनुदान न देण्याच्या अनुषंगाने शासनामार्फत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

अ) राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र शासन, राज्य शासनाच्या विविध योजनांतील प्रकल्पांच्या उपांगासाठी (जसे जलशुध्दीकरण केंद्र, मलशुध्दीकरण केंद्र, पंपिंग स्टेशन्स इ.) आवश्यक असलेल्या जागा जोपर्यंत नागरी स्थानिक

स्वराज्य संस्था उपलब्ध करून देणार नाहीत, तोपर्यंत संबंधित शहरांना राज्य शासनाच्या विविध योजनांमधून कोणतेही अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

आ) अशा विशेष अनुदानाच्या योजनांमध्ये शासनाच्या, महानगरपालिका पायाभूत, महानगरपालिका हद्दवाढ, रस्ते अनुदान, वैशिष्टयपूर्ण योजना, नगरपालिका हद्दवाढ, नवीन नगरपरिषदा/नवीन नगरपंचायती या विशेष योजनेमधून कोणतेही अनुदान मंजूर करण्यात येणार नाही. तसेच अशा शहरांना राज्य शासनाच्या महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत कोणतेही नवीन प्रकल्प देखील मंजूर करण्यात येणार नाहीत.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१११८०६४०१७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.10.11 18:09:44 +05'30'

**(पां.जो.जाधव)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.महालेखापाल महाराष्ट्र-१, मुंबई.
२. मा.महालेखापाल महाराष्ट्र-२, नागपूर.
३. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
६. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
७. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, वित्त/ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, नगर विकास-१ यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
१०. प्रधान सचिव, नगर विकास-२ यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
११. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई.
१२. विशेष कार्य अधिकारी, जेएनएनयुआरएम कक्ष, एमएमआरडीए,मुंबई.
१३. अधिदान व लेखधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१५. विभागीय आयुक्त (सर्व)
१६. जिल्हाधिकारी (सर्व संबंधित)
१७. आयुक्त सर्व संबंधित महानगरपालिका
१८. मुख्याधिकारी, सर्व संबंधित नगरपरिषदा/नगरपंचायती.
१९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-३/कार्यासन अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
२०. नियोजन विभाग (कार्यासन -१४४४), मंत्रालय, मुंबई.
२१. कार्यासन नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती-नवि-३३, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.